# स्वातंत्र्यदूत विल्यम टेल

## स्वित्झर्लंडची लोककथा





फार फार वर्षांपूर्वी गॅसलर नावाचा एक दुष्ट राजा होता. त्याने बरीच वर्षे स्वित्झर्लंडवर राज्य केलं. गॅसलरकडे भलं मोठं सैन्य होतं. त्या सैन्याला हाताशी धरून तो लोकांवर खूप अत्याचार करायचा.



गॅसलरला लोकांच्या मनावर ठसवायचं होतं, की तोच तिथला सर्वोच्च सत्ताधीश आहे. त्यासाठी गॅसलरने एक कायदा केला होता. त्याने बाजाराच्या मध्यभागी एक उंच खांब रोवून त्यावर त्याची टोपी लावलेली होती. त्याच्या दुतर्फा दोन पहारेकरी कायम उभे असत. प्रचलित कायद्यानुसार त्या खांबासमोरून जाणाऱ्या प्रत्येकाने त्या टोपीला लवून मुजरा करणं बंधनकारक होतं.



तिथे विल्यम टेल नावाचा एक शिकारी होता. तो बाजारात प्राण्यांची चामडी विकत असे. त्याला गॅसलरचा हा कायदा अजिबात आवडला नाही. "आपल्याला गुलामासारखी वागणूक दिली जातेय!" तो त्याच्या कुटुंबातल्या लोकांना म्हणाला. "एका स्वतंत्र स्विस व्यक्तीने गॅसलरच्या टोपीसमोर झुकता कामा नये. आपण आपल्या अधिकारांसाठी लढलं पाहिजे."



दुसऱ्या दिवशी विल्यम टेल आपल्या मुलासोबत बाजारात गेला. आधी त्या दोघांनी कमावलेले बरेचसे चामडे विकले. त्यातनं घरातल्या गरजेच्या काही वस्तू विकत घेतल्या.



त्यानंतर परतीच्या मार्गावर विल्यम आणि त्याच्या मुलाला गॅसलरच्या टोपीसमोरून जावे लागले. त्यावेळी त्यांनी लवून मुजरा केलाच नाही. तिथल्या दोन्ही पहारेकऱ्यांना अतिशय राग आला. त्यांनी त्या दोघांना सांगितलं की, त्यांना लवून मुजरा करावाच लागेल. तरीही त्यांनी मुजरा केला नाही.



पहारेकऱ्यांनी त्या बाप-लेकांना पकडून गॅसलरकडे नेले.

"मी तुला तुझा जीव वाचवण्याची एक संधी देतो," तो दुष्ट सत्ताधारी विल्यम टेलला म्हणाला. "त्यासाठी तुला तुझ्या मुलाच्या डोक्यावर ठेवलेले सफरचंद तुझ्या धनुष्याने उडवावे लागेल."



"माझ्या मुलाचा जीव धोक्यात घालण्यापेक्षा मी मरण पत्करेन!"
विल्यम टेलने स्पष्ट उत्तर दिले.
"तू जर हे आव्हान स्वीकारलं नाहीस तर मात्र तुझा मुलगा निश्चित मरेल,"
आता गॅसलरचाही पारा चढला होता.



मग दोन सैनिकांनी विल्यम टेलच्या मुलाला धरून शंभर पावलांवर असलेल्या झाडाजवळ नेले. विल्यम टेलने त्याचा धनुष्य आणि दोन बाण मागितले. तो अतिशय घाबरला होता. लक्ष्यवेध करताना हात स्थिर रहावेत ह्यासाठी तो मनोमन प्रार्थना करत होता. सगळीकडे शांतता पसरली. विल्यम टेलने धडधडत्या काळजाने नेम धरला आणि श्वास रोखून बाण मारला.



बाण सरसरत गेला आणि त्याने अचूक लक्ष्यवेध केला.

सफरचंदाचे बरोबर दोन तुकडे झाले.

"विल्यम टेल आणि त्याचा मुलगा बचावले!" जमावाने एकच गलका केला.

सगळेच आनंदून गेले होते. पण गॅसलर मात्र दुखावला होता.



"अगदीच काही वाईट नाही," गॅसलर तिरसटपणे म्हणाला.
"पण तुला दोन बाण कशासाठी हवे होते?"
"जर पहिला नेम चुकला असता तर तो दुसऱ्या बाणाने मी तुझा जीव घेतला असता."
विल्यम टेल गॅसलरवर ओरडला.



ते ऐकून आधी तर गॅसलरचा चेहरा खर्रकन उतरला.
पण मग तो कुत्सितपणे हसला. त्याने ताबडतोब दोन सैनिकांना बोलावले.
"तुला जिवंत रहावंच लागेल, विल्यम टेल," गॅसलर गुरगुरला. "पण एका अंधाऱ्या कोठडीत. तिथे तुला तुझ्या धनुष्याचं आणि बाणांचं काहीही काम पडणार नाही!"



मग विल्यम टेलला एका छोट्या बोटीवर चढवण्यात आले. गॅसलरचे लोक त्याला कारागृहात घेऊन जात होते. अचानक एक भले मोठे वादळ घोंघावत आले. त्याने बोट मागे-पुढे हिंदकळू लागली. फक्त विल्यम टेलच ती बोट सुरक्षितपणे वल्हवून त्यावरच्या लोकांचे प्राण वाचवू शकला. त्याने ती बोट काठाजवळ वल्हवत आणली आणि काठावर उडी घेतली. आता तो पूर्णपणे मुक्त होता!



आता मात्र विल्यम टेल गॅसलरचा आधीपेक्षा जास्तच तिरस्कार करू लागला होता. त्याच्यासारखे इतरही बरेच जण होते. एके दिवशी गॅसलर त्याच्या सैनिकांसोबत मुलुखाची पाहणी करण्यासाठी निघाला. विल्यम टेल रस्त्यातील झुडुपांमागे दडून बसला होता. गॅसलर जेव्हा त्या झुडुपाजवळून जात होता तेव्हा विल्यमने त्याला ठार मारले.



विल्यम टेल सगळ्यांच्या गळ्यातील ताईत झाला होता. त्याने स्वित्झर्लंडला गॅसलरच्या जाचातून मुक्त केले होते. त्यामुळे लोक आजही त्याच्या शौर्याच्या कथा एकमेकांना सांगत असतात. स्विस लोकांनी विल्यमच्या गौरवार्थ देशभरात त्याचे किती तरी पुतळे उभारले आहेत.

**समाप्त**